राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान अंतर्गत मुलींचे वसतीगृह या योजनेसाठी सन २०१६-१७ करीता केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा (एकत्रित) रु. ४२१.७६ लक्ष इतका निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः आरएमएसएस २०१६/(१३२/१६)/एस.डी.६
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०००३२
तारीख: १० मार्च, २०१७

वाचा -

१) विभागाचा शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२४१६/(४९/१६)/अर्थसंकल्प, दि. ९.८.२०१६
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६
३) मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दि. १७.०८.२०१६ चे पत्र
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८.०२.२०१७

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या अकराव्या पंचवार्षिक योजना कालावधीत देशातील शैक्षणिकदृष्टया मागास गटांमध्ये मुलींचे वसतीगृह योजना सुरु करण्याचानिर्णय घेण्यात आला असून,राज्यातील ४३ शैक्षणिकदृष्टया मागासलेल्या गटांमध्ये १४ ते १८ वयोगटातील १०० मुलींच्या निवासाकरिता ४३ वसतीगृहे सरू करण्यास केंद्र शासनाने मंजूरी दिलेली आहे. राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानांतर्गत मुलींचे वसतीगृह ही योजना केंद्र पुरस्कृत योजना असून, या योजनेचे स्वरुप केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे आहे. केंद्र शासनाने दि. १७.०८.२०१६ च्या आदेशान्वये सदर योजनेसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाकडून रू. २५३.०६ लक्ष इतका निधी आवर्ती बाबींसाठी वितरित केला आहे. सदर योजनेसाठी केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आलेल्या निधीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा रु. १६८.७० लक्ष इतका येतो. केंद्र शासनाकडून प्राप्त रू. २५३.०६ लक्ष व त्याप्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा रु. १६८.७० लक्ष असा एकूण रु.४२१.७६ लक्ष निधी राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानांतर्गत मुलींचे वसतीगृह योजनेसाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानांतर्गत मुलींचे वसतीगृह या योजनेची अंमलबजावणी राज्यामध्ये प्रभावीपणे होण्याकरीता सन २०१६-१७ मध्ये केंद्र हिस्सा रु. २५३.०६ लक्ष व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु. १६८.७० लक्ष असा एकूण रु. ४२१.७६ लक्ष (अक्षरी रूपये चार कोटी

एकवीस लक्ष शहात्तर हजार फक्त) निधी आवर्ती बाबींसाठी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र.ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१, सर्वसाधरण शिक्षण, २०२, माध्यमिक शिक्षण (००) (००)(०१) मुलींसाठी वसतीगृह बांधणे (केंद्र हिस्सा) (४२०२ ६१५७) ५३, मोठी बांधकामे या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतुदीतून रु. २५३.०६ लक्ष इतका निधी वितरित करण्यात यावा.

तसेच मागणी क्र.ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१, सर्वसाधरण शिक्षण, २०२, माध्यमिक शिक्षण (००) (००)(०२) मुलींसाठी वसतीगृह बांधणे (राज्य हिस्सा) (४२०२ ६१६६) ५३, मोठी बांधकामे या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतुदीतून रु. १६८.७० लक्ष इतका निधी वितरित करण्यात यावा.

वरील खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०.४.२०१६ व दि. ०८.०२.२०१७ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. यासाठी सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी, तसेच अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २०.४.२०१६ व दि. ०८.०२.२०१७ च्या परिपत्रकास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर दि. २०.४.२०१६ परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. परिशिष्टातील मुद्दा क्र. ५ नुसार केंद्र शासनाचा निधी प्रत्यक्षात प्राप्त झाला असल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ-१००/अर्थोपाय, दि. ०१.०३.२०१७ अन्वये दिलेले आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१६३८०२१८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.03.14 16:39:14 +05'30'

**( डॉ.सुवर्णा खरात )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान / महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
६. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे.
७. सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सहसंचालक (प्रकल्प), राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १ व २ मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र- १ व २ मुंबई/नागपूर.
११. संचालक, लेखा व कोषागारे, पुणे.
१२. वरिष्ठ कोषाधिकारी, जिल्हा पुणे.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद (सर्व)
१६. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन अधिकारी, (अर्थसंकल्प/रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, एसडी-६.